**प्रधानमंत्री आवास योजनेअंतर्गत राज्यस्तरीय मुल्यमापन समितीची पुनर्रचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो.२०१५/प्र.क्र.११०/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक- ३० मे, २०१७.

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः प्रआयो.२०१५/प्र.क्र.११०/गृनिधो-२, दि.९ डिसेंबर,२०१५.
२) शासन निर्णय क्रमांकः प्रआयो.२०१५/प्र.क्र.११०/गृनिधो-२,दि.१३ एप्रिल,२०१६.
३) केंद्रीय गृहनिर्माण व शहरी दारिद्रय निर्मुलन मंत्रालय यांचे दि.१६ मे,२०१६ रोजीच्या पत्रान्वये CSMC च्या दि.२८.४.२०१६ च्या बैठकीच्या इतिवृत्तातील सुचना.
४) शासन निर्णय क्रमांक: प्रआयो.२०१५/प्र.क्र.११०/गृनिधो-२,दि.१५ जून,२०१६.

**प्रस्तावना :**

सर्वांसाठी घरे-२०२२ या संकल्पनेवर आधारित प्रधानमंत्री आवास योजना (नागरी) या अभियानाच्या केद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार या योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने राज्य मंत्रिपरिषदेने दिलेल्या मान्यतेनुसार गृहनिर्माण विभागाने दि.९.१२.२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित केला आहे. सदर शासन निर्णयानुसार ५१ शहरांची निवड करण्यात आली आहे.तद्नंतर केंद्र शासनाने राज्यातील नव्याने ९१ शहरांचा समावेश करण्यास कळविले आहे. अशाप्रकारे आता ही योजना राज्यात १४२ शहरे व या शहरांलगतच्या नियोजन क्षेत्रांमध्ये (Planned Area) राबविण्यात येत आहे. या योजनेची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली "राज्यस्तरीय मान्यता व संनियंत्रण समिती" गठित करण्यात आली आहे. या योजनेचे राज्यस्तरावर नियंत्रण करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी,धारावी पुनर्वसन प्रकल्प यांची अभियान संचालक,राज्य अभियान संचालनालय (प्रआयो)" या प्रमुखपदी नियुक्ती करण्यात आलेली आहे. तसेच, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) यांना "सुकाणू अभिकरण" (Nodal agency) म्हणून नियुक्त करण्यात आले आहे.

२. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार दि.१५ जून,२०१६ च्या शासन निर्णयान्वये उप सचिव/सह सचिव यांच्या अध्यक्षतेखाली " राज्यस्तरीय मूल्यमापन समिती " (State Level Appraisal Committee) स्थापन करण्यात आलेली आहे.

३. तथापि, प्रकल्प मंजूर करत असतांना सुकाणू अभिकरण (Nodal agency),राज्यस्तरीय मूल्यमापन समिती,राज्य अभियान संचालनालय तसेच मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय मान्यता व संनियंत्रण समिती(SLSMC) इतके स्तर अंतर्भूत असल्याने प्रकल्पांना मंजूरी देत असताना

दिरंगाई होत आहे. सदर योजनेचे महत्व लक्षात घेता राज्यात सदर योजनेस गती देणे शक्य व्हावे यासाठी राज्यस्तरीय मुल्यमापन समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णयः-

केंद्रीय गृहनिर्माण व शहरी दारिद्रय निमुर्लन मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या मार्गदर्शक सूचनास अनुसरुन दि.१५ जून,२०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय मूल्यमापन समितीची पुढीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, गृहनिर्माण, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी,म्हाडा, मुंबई | उपाध्यक्ष |
| ३ | उप सचिव, गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ४ | उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | मुख्य अभियंता-२, म्हाडा, मुंबई | सदस्य |
| ६ | कार्यकारी अभियंता, म्हाडा, सुकाणू अभिकरण, प्रधानमंत्री आवास योजना | सदस्य सचिव |

आवश्यकतेनुसार अध्यक्ष, विशेष निमंत्रित म्हणून इतर अधिकाऱ्यांना राज्यस्तरीय मुल्यमापन समितीच्या बैठकीमध्ये समाविष्ट करुन घेऊ शकतील.

### राज्यस्तरीय मुल्यमापन समितीची कार्यकक्षा व अधिकारः-

उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांनी सुकाणू अभिकरण या नात्याने नागरी स्वराज्य संस्थाकडून प्राप्त होणारे प्रस्तावांची सविस्तर छाननी करुन असे प्रस्ताव राज्यस्तरीय मुल्यमापन समितीच्या बैठकीसमोर सादर करावेत. राज्यस्तरीय मुल्यमापन समिती, सादर प्रस्तावावरील टिपणी व शिफारशींसह मुल्यमापन अहवाल राज्यस्तरीय मान्यता व संनियंत्रण समितीला सादर करेल. सदस्य सचिवांनी सुकाणू अभिकरण स्तरावर प्राप्त प्रस्तावांची छाननी करण्याकरिता १ कक्ष निर्माण करावा व छाननी करुन त्याचे सादरीकरण समितीसमोर करावे.

यापूर्वी राज्यस्तरीय मुल्यमापन समितीची स्थापना करण्यासंदर्भातील शासन निर्णय क्र.प्रआयो.२०१५/प्र.क्र.११०/गृनिधो-२, दि.१५ जून,२०१६ रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५३०१५०१३६७३०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Dhanawade

Digitally signed by Ramchandra Dhanawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf4fd1e4249e6612552db1552e149b0688899cac7ecc37ca9fbf60ec7d9103d6, cn=Ramchandra Dhanawade
Date: 2017.05.30 15:07:20 +05'30'

**( रा.कों.धनावडे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, (पत्राने)
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.विरोधी पक्षनेता,महाराष्ट्र विधानसभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८. मा.सचिव, केंद्रीय गृहनिर्माण व शहरी निर्मुलन मंत्रालय,नवी दिल्ली.
९. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१०. व्यवस्थापकीय संचालक, शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित,गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१२. संचालक,,अभियान संचालनालय (प्रधानमंत्री आवास योजना) तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, धारावी पुनर्वसन प्रकल्प, गृहनिर्माण भवन,वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३. मुख्य अभियंता-२ राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, प्रधानमंत्री आवास योजना कक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व),मुंबई-५१.
१४. मुख्य अधिकारी, अमरावती/पुणे/मुंबई/नाशिक/औरंगाबाद/कोकण/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ.
१५. संबंधित आयुक्त/मुख्याधिकारी, महानगरपालिका/नगरपालिका दि.९.१२.२०१५ च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रानुसार.
१६. निवडनस्ती/गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.